# महाराष्ट्र शासन

## नियोजन विभाग,

**शासन निर्णय, क्रमांक-स्थाविका २००७/प्र.क्र.१७०/का.१४८२,**

**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.**

**दिनांक - १८ फेब्रुवारी, २०११.**

**प्रस्तावना :-**

"लोकोपयोगी लहान कामांचा कार्यक्रम" राज्यात १९८४-८५ या वित्तीय वर्षापासून राबविण्यात येत आहे. सन १९९०-९१ मध्ये या कार्यक्रमाचे नामाभिधान "स्थानिक विकास कार्यक्रम" असे करण्यात आले. सन १९९६-९७ पासून या कार्यक्रमाचे नाव "आमदारांचा स्थानिक विकास कार्यक्रम" असे बदलण्यात आले. ज्या कामांना जिल्हा नियोजन समितीत प्राधान्य व महत्व मिळत नाही किंवा जी कामे जिल्हा योजनेत घेण्यात येत नाहीत अशी लोकोपयोगी कामे या योजनेतून घेतली जातात. हा कार्यक्रम राबविण्याची कार्यपद्धती व या कार्यक्रमांतर्गत कोणकोणती कामे हाती घेता येतील याबाबतचे मार्गदर्शन शासन स्तरावरुन वेळोवेळी करण्यात येते. या अनुषंगाने वेगवेगळे शासन निर्णय नियोजन विभाग तसेच अन्य विभागांकडून निर्गमित करण्यात आले आहेत. परंतु, या कार्यक्रमाच्या यशस्वी अंमलबजावणीसाठी अधिकारी / कर्मचारी तसेच लोकप्रतिनिधी यांच्या सोयीसाठी सर्वसमावेशक आदेश आवश्यक आहेत. यासाठी या पूर्वीचे सर्व शासन निर्णय/परिपत्रक/शुध्दीपत्रक/पत्रे अधिक्रमित/रद्दबातल करणे आवश्यक ठरते. तसेच वाढलेले बाजारभाव लक्षात घेता, आमदार स्थानिक विकास कार्यक्रमांतर्गत विशिष्ट कामांसाठी विहित केलेली मर्यादा वाढविणे व या कार्यक्रमात कालानुरुप बदल करणे याकरिता एकत्रित व सुधारित सर्वसमावेशक शासन निर्णय निर्गमित करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय :-**

आमदार स्थानिक विकास कार्यक्रमासंदर्भात आतापर्यंत निर्गमित केलेले सर्व धोरणात्मक शासन निर्णय/परिपत्रक/शुध्दीपत्रक/पत्रे (निधी वितरणाचे आदेश

वगळून) अधिक्रमित/रद्दबातल करुन हा सर्वसमावेशक सुधारित शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे. हा शासन निर्णय निर्गमित झाल्यानंतर यापूर्वीच्या आदेशांतील कोणत्याही तरतुदी लागू राहणार नाहीत.

**कार्यक्रमाचे नामाभिधान :-**

**२. या कार्यक्रमाचे नामाभिधान "आमदार स्थानिक विकास कार्यक्रम" असे आहे. ही राज्यस्तरीय योजना राहील.**

**कार्यक्रमाचा उद्देश व अनुज्ञेय निधी :-**

३(१) जिल्हा वार्षिक योजना राबविताना निधी अभावी किंवा योजनेतील प्राथम्यक्रमा अभावी जी लहान-लहान लोकोपयोगी कामे मागे राहतात अशी कामे स्थानिक लोकप्रतिनिधींना सुचविता येणे तसेच या कार्यक्रमांतर्गत शासनाची स्थायी स्वरुपाची मालमत्ता निर्माण करणे हा या कार्यक्रमाचा उद्देश आहे.

३(२) या कार्यक्रमांतर्गत प्रत्येक विधानसभा मतदार संघासाठी प्रति आर्थिक वर्षासाठी रु. १५०.०० लाख निधी अनुज्ञेय असेल. तसेच विधानपरिषद सदस्यांनाही त्यांच्या कार्यकालानुसार प्रति आर्थिक वर्षी रु.१५०.०० लक्ष निधी अनुज्ञेय असेल.

**अनुज्ञेय कामे :-**

४(१) या कार्यक्रमांतर्गत घ्यावयाची कामे शासकीय किंवा स्थानिक स्वराज्य संस्थांच्या जागेवरच घेता येतील.

४(२) या कार्यक्रमांतर्गत निर्माण होणारी मालमत्ता ही शासनाच्या किंवा स्थानिक स्वराज्य संस्थेच्या मालकीची राहील. कामे मंजूर करण्यापूर्वी ह्या कामांच्या देखभाल दुरुस्तीची हमी संबंधित स्थानिक स्वराज्य संस्थेने घेणे बंधनकारक आहे.

४(३) या योजनेंतर्गत अनुज्ञेय असलेल्या कामांची यादी **परिशिष्ट-१** मध्ये देण्यात आली आहे. या योजनेंतर्गत अनुज्ञेय नसलेल्या कामांची यादी **परिशिष्ट-२** मध्ये देण्यात आली आहे. परिशिष्ट-१ मध्ये देण्यात आलेल्या कामांव्यतिरिक्त विधीमंडळ सदस्यांना एका आर्थिक वर्षात अनुज्ञेय असलेल्या निधीच्या ५ टक्के रक्कम वैशिष्टयपूर्ण कामांसाठी मंजूर करता येईल. या कामांबाबत खालीलप्रमाणे कार्यवाही करावी :-

१. उपरोक्त वैशिष्टयपूर्ण कामांचा समावेश **परिशिष्ट-१** मध्ये होत नसावा.
२. ही वैशिष्टयपूर्ण कामे **परिशिष्ट-२** मध्ये नमूद केलेल्या निकषांची पूर्तता करणारी असावीत.
३. या वैशिष्टयपूर्ण कामांसाठी आमदार स्थानिक विकास कार्यक्रमाच्या इतर सर्व अटी, शर्ती व निकष लागू राहतील.

काही वैशिष्टयपूर्ण कामांची सर्वसाधारण यादी **परिशिष्ट-३** मध्ये देण्यात आली आहे. वरील अटींच्या अधीन राहून अशाप्रकारची अन्य कामे या कार्यक्रमांतर्गत घेता

येतील. जिल्हाधिकारी यांनी सर्वप्रथम वरील मुद्यांनुसार सर्व खात्री करावी व त्यानंतर देखील या वैशिष्टयपूर्ण कामांबाबत काही शंका असल्यास, या कामांच्या सविस्तर माहितीसह प्रस्ताव संबंधित जिल्हाधिकारी यांनी नियोजन विभागाकडे पाठवावा.

**<u>कामे सुचविण्याची पद्धत :-</u>**

५(१) विधानसभा सदस्यांना त्यांच्या संबंधित मतदारसंघातच निधी प्रस्तावित करता येईल. राज्यपालांद्वारा विधानसभेवर नामनियुक्त सदस्यांना संपूर्ण राज्यात निधी प्रस्तावित करता येऊ शकेल. विधानपरिषद सदस्यांच्या बाबतीत खालीलप्रमाणे कार्यक्षेत्राची मर्यादा पाळावी :-

| | | |
|---|---|---|
| १. | विधानसभा सदस्यांद्वारा निर्वाचित | संपूर्ण राज्य |
| २. | स्थानिक प्राधिकारी संस्थांद्वारा निर्वाचित | मतदार संघाचे विहित कार्यक्षेत्र |
| ३. | पदवीधरांद्वारा निर्वाचित | मतदार संघाचे विहित कार्यक्षेत्र |
| ४. | शिक्षकांद्वारा निर्वाचित | मतदार संघाचे विहित कार्यक्षेत्र |
| ५. | राज्यपालांद्वारा विधानपरिषद नामनियुक्त | संपूर्ण राज्य |

५(२) विधानपरिषद सदस्यांनी तसेच विधानसभेवर राज्यपालांनी नामनियुक्त केलेल्या सदस्यांनी ‘नोडल जिल्हा’ घोषित करणे आवश्यक आहे. ‘नोडल जिल्हा’ घोषित करताना ज्या विधानपरिषद सदस्यांना मतदारसंघ/कार्यक्षेत्र आहे, त्याच्याशी संबंधित एक जिल्हा ते ‘नोडल जिल्हा’ म्हणून घोषित करतील तर ज्या विधानपरिषद सदस्यांना मतदारसंघ/कार्यक्षेत्र नाही ते सदस्य त्यांच्या सोयीनुसार राज्यातील कोणताही एक जिल्हा ‘नोडल जिल्हा’ म्हणून घोषित करतील व तसे शासनास (नियोजन विभागास) कळवतील.

५(३) विधानसभा सदस्यांनी कामांची शिफारसपत्रे त्यांच्या नाममुद्रीत पत्रावर स्वतःच्या सहीने, **शक्यतो प्रत्येक आर्थिक वर्षाच्या पहिल्या तीन महिन्यांमध्ये**, जिल्हाधिकाऱ्यांकडे पाठवावीत. विधान परिषद सदस्यांनी देखील कामांची शिफारसपत्रे त्यांच्या नाममुद्रीत पत्रावर स्वतःच्या सहीने, **शक्यतो प्रत्येक आर्थिक वर्षाच्या पहिल्या तीन महिन्यांमध्ये**, त्यांनी सुचविलेल्या नोडल जिल्हाधिकाऱ्यांकडे पाठवावीत.

**<u>कामांना मंजूरी देण्याची पद्धत :-</u>**

६(१) **आमदार महोदयांनी कामांचे प्रस्ताव दिल्यानंतर शक्यतो तीन महिन्यांच्या कालावधीत कामांचे प्रस्ताव तपासून संबंधित जिल्हाधिकारी यांनी अनुज्ञेय असलेल्या कामांना मंजूरी दयावी.** या कार्यक्रमांतर्गत प्रथम वर्षी आमदारांना अनुज्ञेय असलेल्या निधीच्या दीडपट रकमेच्या मर्यादेत कामांना मंजुरी दयावी. मात्र दुसऱ्या

वर्षापासून अनुज्ञेय निधीतून पहिल्या वर्षअखेर अपूर्ण राहिलेल्या कामांसाठी लागणारी रक्कम प्रथम उपलब्ध करुन दिल्यानंतर (स्पील ओव्हर) उरलेल्या रकमेच्या दीडपट एवढी कामे मंजूर करावीत.

६(२) विहित कार्यकालाची समाप्ती, राजीनामा अथवा मृत्यु अशा कोणत्याही कारणाने आमदार महोदयांचा कार्यकाल समाप्त होत असल्यास, कार्यकालाच्या शेवटच्या वर्षाच्या कालखंडामध्ये त्यांनी सुचविलेल्या आधीच्या कामांपैकी अपूर्ण राहिलेल्या कामांसाठी आवश्यक तो निधी उपलब्ध करुन दिल्यानंतर उरलेल्या रकमेएवढयाच रकमेची कामे जिल्हाधिकाऱ्यांनी मंजूर करावीत.

६(३) विधानपरिषद सदस्य ज्या वर्षी निवृत्त होत असतील किंवा ज्या वर्षी एखाद्या विधान परिषद सदस्यांनी राजीनामा दिला असेल अथवा विधान परिषद सदस्याचा मृत्यु झ ाला असल्यास, त्या वर्षातील त्यांच्या विधान परिषद सदस्यत्वाच्या पूर्ण महिन्यांच्या कालावधीसाठी उपलब्ध होणाऱ्या निधीच्या प्रमाणात कामे मंजूर करावीत.

६(४) जे विधान परिषद सदस्य नजिकच्या काळामध्ये निवृत्त होणार आहेत किंवा एखादया विधानपरिषद सदस्यांनी राजीनामा दिल्यास अथवा मृत्यु झाल्यास, अशा विधान परिषद सदस्यांच्या कार्यकालाच्या शेवटच्या वर्षी प्रथम त्यांनी सुचविलेली अपूर्ण कामे पूर्ण होण्यासाठी आवश्यक असणारा निधी राखून ठेवावा व उर्वरित निधीच्या मर्यादेतच नवीन कामे मंजूर करावीत. असे करुनही कामांचा काही भाग अपूर्ण राहिला तर त्यांच्या जागेवर येणाऱ्या नवीन विधान परिषद सदस्यांच्या निधीतून अपूर्ण कामासाठी निधी राखून ठेवून उर्वरित निधीच्या मर्यादेतच कामे मंजूर करावीत.

विधानपरिषद सदस्यांना अनुज्ञेय असलेल्या निधीतून अपूर्ण कामांना लागणारा निधी वजा करुन उपलब्ध निधीच्या दिडपट रक्कम विचारात घेवून ज्या इतर जिल्ह्यांना कामे प्रस्तावित केली आहेत त्या जिल्हाधिकारी यांना कामनिहाय निधी चालु आर्थिक वर्षात किंवा पुढील आर्थिक वर्षात उपलब्ध करुन दिला जाईल किंवा कसे याबाबत नोडल जिल्हाधिकारी यांनी लेखी कळवावे. कामनिहाय निधी उपलब्ध असल्याबाबतचे पत्र नोडल जिल्हाधिकारी यांचेकडून प्राप्त झाल्याशिवाय काम ज्या जिल्ह्यात आहे त्या जिल्ह्याच्या जिल्ह्याधिकारी यांनी त्या कामास मंजूरी देऊ नये.

६(५) विधान परिषद सदस्यांनी त्यांच्या मतदार संघातील जिल्ह्यांत सुचविलेल्या कामांसाठी नोडल जिल्ह्याचे जिल्हाधिकारी हे काम सुचविलेल्या संबंधित जिल्ह्याचे जिल्हाधिकारी यांना निधी वितरित करतील. नोडल जिल्हाधिकारी यांनी ज्या जिल्ह्यांना निधी वितरित केला आहे त्या जिल्ह्याचे जिल्हाधिकारी हे नोडल जिल्हाधिकारी यांना खर्चाची माहिती वेळोवेळी पाठवतील. नोडल जिल्हाधिकारी हे संबंधित विधानपरिषद सदस्यांच्या खर्चाचा एकत्रित अहवाल वेळोवेळी विभागीय आयुक्त व शासनास सादर करतील.

६(६) आमदार स्थानिक विकास कार्यक्रमांतर्गत एकूण तरतूदीच्या १० टक्के तरतूद अनुसुचित जाती व अनुसुचित जमाती कल्याणासाठी खर्च करावी. संबंधित विधिमंडळ

सदस्यांनी एखाद्या वर्षात या निधीच्या खर्चासाठी कामे प्रस्तावित केली नाहीत तर या कार्यक्रमासाठी असलेली सदरची राखीव तरतूद समर्पित केली जाईल. निधीचे काम निहाय वाटप करतांना १० टक्के राखीव निधीचे वाटप केल्याची खात्री संबंधित जिल्हाधिकारी यांनी करावी. राखीव निधीतून घ्यावयाच्या कामांसाठी प्राथम्याने निधीचे वाटप करावे. विधानपरिषद सदस्यांच्या बाबतही नोडल जिल्हाधिकारी यांनी राखीव निधीच्या रकमेएवढी कामे हाती घेतल्याची खात्री करावी.

**कामांच्या शिफारशी संदर्भात व कामे मंजूर करण्याबाबत सूचना :-**

७(१) या कार्यक्रमांतर्गत घेण्यात येणाऱ्या कामांबाबत खालील बाबी विचारात घ्याव्यात :-

अ) या कार्यक्रमांतर्गत घेण्यात येणाऱ्या कामांचा अंदाजित खर्च विहित मर्यादेत आसावा.

ब) या कार्यक्रमाखाली नवीन कामे घेताना प्रथमतः अपूर्ण कामांसाठी पूर्णपणे तरतूद करण्यात आली आहे याची खातरजमा करुन नंतरच उर्वरीत निधीतून नवीन कामे घ्यावीत.

क) अन्य नियमित योजनेसाठी/ कामांसाठी जे निकष, नियम, मर्यादा, धोरण, कार्यपध्दती इ. लागू असतील ते सर्व या कार्यक्रमाखालील कामांसाठी लागू राहतील.

ड) या कार्यक्रमांतर्गत करण्यात आलेली विधानसभा मतदारसंघ निहाय तरतूद त्या त्या मतदारसंघातच खर्च होईल हे पहावे. एखाद्या मतदार संघाची तरतूद काही अपरिहार्य परिस्थितीत खर्च होणार नसेल तर, ती दुसऱ्या मतदार संघात वापरता येणार नाही. ती तरतूद शासनास समर्पित करावी.

७(२) जागेअभावी किंवा तांत्रिक बाबतीत काही अडचणी आल्यास तसेच प्रशासनिक अडचणी आल्यास कामे रद्द करता येतील. परंतु आराखडे व अंदाजपत्रके तयार केल्यानंतर सुचविलेली कामे रद्द करता येणार नाहीत. **माजी विधानमंडळ सदस्यांनी त्यांच्या कार्यकालात प्रस्तावित केलेली कामे प्रशासकीय मंजूरी दिल्यानंतर देखील त्यांच्या कार्यकालात सुरु झाली नसल्यास तसेच या कामांचा निधी वितरित केला गेला नसल्यास अशी कामे रद्द करता येतील.**

७(३) आमदार स्थानिक विकास कार्यक्रमांतर्गत घेण्यात येणाऱ्या कामांना मंजूरी देण्यापूर्वी, संबंधित स्थानिक स्वराज्य संस्थेकडून /अभिकरणाकडून काम पूर्ण झाल्यावर त्याचे परिरक्षण व देखभाल करण्यास संबंधित स्थानिक स्वराज्य संस्था/अभिकरण तयार असल्याचे हमी पत्र **परिशिष्ट-४** नुसारच्या विहित नमुन्यात घेतल्यानंतरच कामांना मंजुरी देण्यात यावी.

७(४) या कार्यक्रमांतर्गत मंजूर झालेली कामे त्याच वर्षी किंवा पुढच्या वर्षी पूर्ण करण्यात यावीत. परंतु डांबरीकरणाची कामे तांत्रिकदृष्टया योग्यरितीने होण्याकरिता जेवढा कालावधी आवश्यक असेल त्या मर्यादेपर्यंत १-२ वर्षांचा कालावधी शिथिल करण्यात येत आहे.

७(५) या कार्यक्रमांतर्गत अनुज्ञेय कमाल मर्यादेपेक्षा जास्त रकमेची कामे ही मोठया कामाचे लहान लहान भाग करुन हाती घेण्यात येऊ नयेत.

७(६) प्रचलित नियमांप्रमाणे या कार्यक्रमाखाली घेण्यात येणाऱ्या कामांना तांत्रिक मान्यता देण्याचे अधिकार संबंधित प्रशासकीय विभागांना असतील. कामासाठी निविदा काढणेसाठी विहित पध्दतीचा अवलंब करावा.

**सुधारित प्रशासकीय मान्यता :-**

८(१) या कार्यक्रमाखाली मंजूर करण्यात आलेल्या कामांच्या मूळ अंदाजपत्रकात काही "अपरिहार्य तांत्रिक बदल" झाल्यामुळे जर वाढ होत असेल तर व  जिल्हा दरसूचीत वाढ झाल्यामुळे कामांच्या अंदाजपत्रकात वाढ झाली असेल तर आमदार स्थानिक विकास कार्यक्रमांतर्गत घेण्यात येणाऱ्या कामांना सुधारित प्रशासकीय मंजूरी देण्याचे अधिकार जिल्हाधिकाऱ्यांना देण्यात येत आहेत. जिल्हाधिकाऱ्यांनी सुधारित प्रशासकीय मान्यता देताना या कार्यक्रमांतर्गत  शासनाने घालून दिलेली  मार्गदर्शक तत्वे लक्षात घेणे आवश्यक आहे. तथापि, सुधारित प्रशासकीय मंजूरी ही या कार्यक्रमाखालील विहित रु.१५.०० लाख व कोल्हापूर पध्दतीच्या बंधाऱ्याच्या बाबतीत रु.२०.०० लाख खर्चाच्या मर्यादेत असणे आवश्यक आहे. परंतु एखादया कामाची सुधारित अंदाजपत्रकातील रक्कम वित्तीय मर्यादेपेक्षा अधिक असेल तर मात्र अशा कामांचे सुधारित प्रशासकीय मंजूरीचे प्रस्ताव जिल्हाधिकाऱ्यांनी शासनाकडे मंजूरीसाठी पाठवावेत.

८(२) या कार्यक्रमांतर्गत जिल्हा परिषदेमार्फत कार्यान्वित केलेल्या कामांवर एकूण प्रत्यक्ष खर्चाच्या ३ टक्के तसेच सार्वजनिक बांधकाम विभाग व इतर शासकीय अभिकरणांना सार्वजनिक बांधकाम विभाग संहितेनुसार अभिकरण शुल्क देण्यात यावे. हे शुल्क प्रथम मंजूर केलेल्या कामांना लागू राहील.

**कामाची अंमलबजावणी :-**

९(१) एका वित्तीय वर्षात घेतलेल्या कामांपैकी पूर्ण व अपूर्ण कामांचा तपशील, काम पूर्ण झाल्याचे प्रमाणपत्र, परिरक्षण प्रमाणपत्र इत्यादि आवश्यक कागदपत्रे जिल्हाधिकारी कार्यालयाने दरवर्षी न चुकता कार्यान्वयीन यंत्रणांकडून प्राप्त होतील याची काळजी घ्यावी. त्याकरिता संबंधित अधिकाऱ्यांची बैठक जिल्हाधिकाऱ्यांनी दरवर्षी मे महिन्याच्या पहिल्या आठवडयात बोलवावी व त्यांचे संनियंत्रण करावे. याप्रमाणे आढावा घेतला जातो की नाही यावर उप आयुक्त (नियोजन), विभागीय आयुक्तांचे कार्यालय यांनी देखरेख करावी व अशाप्रकारे आढावा घेण्यात आला आहे याबद्दलचा अहवाल नियोजन विभागास दरवर्षी ऑगस्ट अखेरपर्यंत सादर करावा.

९(२) या कार्यक्रमांतर्गत मंजूर केलेले काम पूर्ण झाल्यावर काम पूर्ण झाल्याचे प्रमाणपत्र संबंधित यंत्रणेने जिल्हाधिकाऱ्यांना पाठवावे. तसेच असे प्रमाणपत्र मिळविण्यासाठी जिल्हाधिकारी कार्यालयाकडून पाठपुरावा करण्यात यावा. यासाठी जिल्हाधिकाऱ्यांनी मंजूर केलेल्या प्रत्येक कामाबाबत एक नोंदवही ठेवावी. उप आयुक्त (नियोजन), विभागीय आयुक्तांचे कार्यालय यांनी सुद्धा दरवर्षी एकदा तरी या नोंदवहयांची पडताळणी करुन या नोंदवहया अद्ययावत ठेवल्या जातात किंवा नाही याची पाहणी करावी. त्यांनी, ज्या कामांच्या बाबतीत कामे पूर्ण झाल्याचे दाखले मिळाले नसतील, त्यासंबंधी जिल्हाधिकारी कार्यालयांकडे पाठपुरावा करुन ते मिळविण्यात येतील याची दक्षता घ्यावी.

९(३) जिल्हाधिकारी यांनी कामांना प्रशासकीय मंजूरी दिल्यानंतर कामे संबंधित कार्यान्वयीन यंत्रणेकडे अंमलबजावणीसाठी सुपूर्द करावीत. जसे जिल्हा परिषद क्षेत्रातील कामे जिल्हा परिषदेकडे, नगरपालिका/ नगर परिषदा क्षेत्रातील कामे नगरपालिका/नगर परिषदाकडे, राज्यस्तरावरील कामे शासकीय यंत्रणेकडे व मुंबई शहरामधील कामे शासकीय यंत्रणा/ महानगरपालिका/ मुंबई गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ, मुंबई इमारती दुरुस्ती व पुनर्रचना मंडळ इत्यादि.

९(४) एखाद्या अंमलबजावणी यंत्रणेला विशिष्ट काम करणे शक्य नसेल तर, त्याबद्दल त्यांनी तशी लेखी विनंती केल्यास, जिल्हाधिकारी सदर काम दुसऱ्या कार्यान्वयीन यंत्रणेकडे सोपवू शकतील.

**<u>कामांची तपासणी :-</u>**

१०(१) जिल्हा नियोजन अधिकाऱ्यांच्या नेतृत्वाखाली या कार्यक्रमाशी प्रामुख्याने संबंधित असलेल्या जिल्हा स्तरावरील २ किंवा ३ अधिकाऱ्यांचा समावेश असलेले पथक जिल्हाधिकारी यांनी निर्माण करावे. या पथकाने आधीच्या वर्षात या कार्यक्रमांतर्गत मंजूर केलेल्या कामांपैकी किमान १५ ते २० कामे रॅन्डम सॅम्पलिंग पध्दतीने निवडून त्या कामांची नमुना पाहणी प्रत्यक्ष भेटीव्दारे दर महिन्यात करावी. कामे निवडताना त्यातील काही कामे आदिवासी/दुर्गम भागातील असतील याची दक्षता घ्यावी. कामे मंजूरीप्रमाणे नियोजित ठिकाणी पूर्ण करण्यात आली किंवा कसे व त्याचा उपयोग अपेक्षेप्रमाणे केला जातो किंवा नाही याबाबतचा **<u>परिशिष्ट-५ नुसार</u>** अहवाल या समितीने जिल्हाधिकारी यांना सादर करावा. जर काही त्रुटी निदर्शनास आल्या तर त्या जिल्हाधिकारी यांच्या स्तरावरुन दूर कराव्यात. आवश्यकता असल्यासच शासनाचे मार्गदर्शन घ्यावे.

१०(२) जिल्हाधिकारी यांनी आपल्या तपासणी कामाचा अहवाल पुढील महिन्याच्या १० तारखेपर्यंत विभागीय आयुक्तांना सादर करावा. उप आयुक्त (नियोजन) यांनी तीन महिन्यांतून एकदा या कार्यक्रमांतर्गत मंजूर केलेल्या कामांपैकी किमान १५ ते २० कामे रॅन्डम सॅम्पलिंग पध्दतीने निवडून त्या कामांची नमुना पाहणी प्रत्यक्ष भेटीव्दारे करावी व जिल्हाधिकारी यांच्याकडील मासिक अहवाल व आपल्या स्तरावरील त्रैमासिक अहवाल शासनास सादर करावा.

१०(३) नियोजन विभागातील सह सचिव/उप सचिव यांनी जिल्हा दौरा केल्यास अथवा क्षेत्रीय भेटी दिल्यास या कार्यक्रमांतर्गत करण्यात आलेल्या कामांची रॅन्डम सॅम्पलिंग पध्दतीने तपासणी करावी व त्याचा अहवाल प्रधान सचिव, नियोजन यांना सादर करावा.

१०(४) कामे पूर्ण झाल्यावर कामांच्या दर्शनी भागावर खालीलप्रमाणे फलक लावण्यात यावा. कामे बांधकाम स्वरुपाची नसतील तेव्हा लाकडी किंवा तत्सम फलक शक्य असल्यास लावावा.

| |
|---|
| आमदारांच्या स्थानिक विकास कार्यक्रमांतर्गत घेतलेले काम -<br>संबंधित आमदारांचे नाव व कामाचे नांव -<br>कामाचे वर्ष -<br>काम सुरु झाल्याचा दिनांक -<br>काम पूर्ण झाल्याचा दिनांक -<br>कामावर करण्यात आलेला एकूण खर्च - |

**<u>नियंत्रक अधिकारी</u>**

११(१) या निधीतून होणाऱ्या खर्चासाठी संबंधित जिल्हाधिकारी हे "नियंत्रक अधिकारी" असतील. या कार्यक्रमासाठीचा निधी अर्थसंकल्पित केल्यानंतर विहीत पध्दतीने वितरित करण्यात येईल. या कार्यक्रमावर होणाऱ्या खर्चाचा हिशोब स्वतंत्रपणे ठेवण्यात यावा व यासाठी योग्य अशी विहित लेखापध्दती अवलंबविण्यात यावी.

११(२) जिल्हाधिकारी यांनी त्यांना प्राप्त झालेला निधी कामांच्या प्रगतीनुसार कार्यान्वयीन यंत्रणांना वितरित करावा.

११(३) जिल्हाधिकारी कार्यालयात नियमानुसार विहित केलेल्या सर्वसाधारण कॅश बुकमध्ये या कार्यक्रमांतर्गतच्या निधीशी संबंधित जमाखर्चाच्या नोंदी घेणे आवश्यक आहे.

११(४) जिल्हाधिकारी यांनी खर्चाचा आढावा घेऊन दर ३ महिन्यांनी निधीचे वितरण जिल्हा परिषदेकडे म्हणजेच मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांना करणे अपेक्षित आहे. म्हणजे जिल्हा परिषदेकडे वर्षअखेर जास्त निधी शिल्लक राहणार नाही. वित्तीय वर्षअखेरीस शिल्लक असलेल्या निधीबाबत जिल्हा परिषद व जिल्हाधिकारी यांनी वित्त विभागाकडून वेळोवेळी निर्गमित होणाऱ्या निदेशांनुसार कार्यवाही करावी. असा निधी विहित कालावधीत शासनास परत करण्याची सर्वस्वी जबाबदारी जिल्हा परिषदेची व पाठपुरावा करण्याची जबाबदारी जिल्हाधिकाऱ्यांची राहील. जिल्हा परिषदेने केलेल्या कामांवरील प्रत्यक्ष खर्चाच्या ३ टक्के रक्कम अभिकरण शुल्क म्हणून त्यांना कापून घेता येईल.

११(५) नगर परिषदा/महानगरपालिका/मुंबई गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ (म्हाडा) / मुंबई इमारती दुरुस्ती व पुनर्ररचना मंडळ/ महाराष्ट्र जीवन प्राधिकरण व अशा अन्य संस्थांना त्रैमासिक पध्दतीने निधी वितरित करण्यात यावा. आधी दिलेला निधी पूर्ण खर्च झाल्याशिवाय अतिरिक्त निधी उपलब्ध करुन दिला जाऊ नये. तसेच आधीच्या

वित्तीय वर्षात दिलेला निधी त्याच कामासाठी वापरला गेला आहे किंवा नाही याबाबतचा दाखला प्राप्त झाल्याशिवाय पुढील वर्षातील पहिल्या तिमाहीचा निधी मुक्त करु नये.

११(६) नगर परिषदा / महानगरपालिका या संस्थांनी त्यांचेकडील मागील आर्थिक वर्षातील शिल्लक निधी शासनाकडे पुढील तीन महिन्यांमध्ये परत केला नाही तर, जिल्हाधिकारी यांनी त्याबाबतचा अहवाल शासनाकडे (नियोजन विभागाकडे ) पाठवावा. अशी शिल्लक रक्कम नगरविकास विभागातर्फे त्यांना वितरित करण्यात येणाऱ्या अनुदानातून वळती करुन घेण्यात येईल.

११(७) या कार्यक्रमांतर्गत आर्थिक वर्षाच्या अखेरीस कार्यान्वयीन यंत्रणांच्या खात्यावर अखर्चित स्वरुपात शिल्लक असलेला निधी शासनाचे प्रचलित आदेश विचारात घेऊन, शासनास समर्पित करणे आवश्यक राहील. या तरतूदीची काटेकोरपणे अंमलबजावणी होईल याची जिल्हाधिकारी यांनी दक्षता घ्यावी.

**निधी वितरण :-**

१२. प्रत्येक विधानसभा मतदार संघासाठी अनुज्ञेय असलेला निधी अर्थसंकल्पित करून संबंधित जिल्हाधिकारी यांचेकडे वितरित करण्यात येईल. तसेच विधानपरिषद सदस्यांना अनुज्ञेय असलेला निधी त्यांनी कळविलेल्या नोडल जिल्हाधिकाऱ्यांकडे वितरित करण्यात येईल. या कार्यक्रमांसाठी निधी खालील लेखाशीर्षांतर्गत अर्थसंकल्पित, वितरित व खर्च करण्यात येईल :-

" मागणी क्रमांक ओ-९
४५१५- इतर ग्राम विकास कार्यक्रमावरील भांडवली खर्च
१०२ सामुहिक विकास
पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- राज्य योजनांतर्गत योजना
(१) बहुउद्देशीय कार्यक्रम
(००)(०१) आमदारांचा स्थानिक विकास कार्यक्रम
(४५१५ ००१२) (योजनांतर्गत) (दत्तमत) ५३ मोठी बांधकामे "

तसेच या कार्यक्रमांतर्गतचा आकस्मिक खर्चासाठीचा निधी खालील लेखाशीर्षांतर्गत अर्थसंकल्पित, वितरित व खर्च करण्यात येईल :-

" मागणी क्र.ओ-४
२५१५ इतर ग्रामविकास कार्यक्रम-१०२, सामुहिक विकास,
पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना
(१) बहुउद्देशीय कार्यक्रम

(००) (०३) आमदारांचा स्थानिक विकास कार्यक्रमांतर्गत
आकस्मिक खर्च (२५१५ ०२४२) (योजनांतर्गत) (दत्तमत) "

**समाजमंदिर/सामाजिक सभागृह इ.बांधकामे देखभाल दुरुस्तीसाठी सामाजिक संस्थांना देण्याबाबत :-**

१३. आमदार स्थानिक विकास कार्यक्रमांतर्गत बांधण्यात आलेल्या इमारतींची देखभाल दुरुस्ती स्थानिक स्वराज्य संस्थांकडून होत नसल्यास, अशा लोकोपयोगी कार्यासाठी बांधण्यात आलेल्या इमारतींची देखभाल दुरुस्ती घोषित गलिच्छ वस्तीबरोबर इतर क्षेत्रात नियमितपणे सामाजिक कार्य करणाऱ्या रजिस्टर संस्था/ विश्वस्त संस्थांना अनुज्ञेय करण्यास खालील अटी /शर्ती व नियमांच्या अधीन राहून अनुमती देण्यात येत आहे:-

१. ही बांधकामे शासन/महानगरपालिका/अन्य स्थानिक स्वराज्य संस्था यांच्याकडून पूर्ण केली जातात. त्यांची मालकी शासन/संबंधित स्वराज्य संस्थांची राहील.

२. संबंधित नोंदणीकृत संस्था/विश्वस्त संस्था यांच्याकडून विहित नियमानुसार भाडे वसूल केले जाईल.

३. या बांधकामांच्या देखभालीची व सामान्य दुरुस्त्यांची संपूर्ण जबाबदारी चालविणाऱ्या संबंधित संस्थांवर राहील. शासन अगर संबंधित स्थानिक संस्था यासाठी कोणतेही वेगळे अनुदान देणार नाही.

४. सदरहू संस्थांना या बांधकामांचा उपयोग व्यापारी (commercial) प्रयोजनासाठी करता येणार नाही.

५. या संस्थांकडून कामे सुरळीत चालू आहेत की नाही याची जिल्हाधिकारी वर्षातून कमीत कमी एकदा तपासणी करतील व अहवालानुसार काम सुरळीत चालू नसल्याचे आढळून आल्यास शासनाला संबंधित स्थानिक स्वराज्य संस्थेला ३ महिन्यांची नोटीस देऊन सदर मालमत्ता स्वत:कडे परत घेता येईल.

६. वरील अटी लक्षात घेऊन संस्थेबरोबर केलेला करारनामा संबंधित कार्यान्वयीन यंत्रणेने प्राप्त करुन तो जिल्हाधिकाऱ्यांकडे पाठवावा व त्यास जिल्हाधिकारी यांची अनुमती मिळवावी. ती प्राप्त झाल्यास काम संबंधित संस्थेकडे सोपवावे.

७. या संस्था चालविण्यास जर एकापेक्षा जास्त नोंदणीकृत संस्था/विश्वस्त संस्था यांचे अर्ज आले असतील तर, मागणी असणाऱ्या संस्थेबाबत पूर्वी केलेली कामे/संस्थेचे काम करावयाची क्षमता, संस्थेची गुणवत्ता व आर्थिक स्थिती याचा तुलनात्मक विचार करुन जिल्हाधिकाऱ्यांनी निर्णय घ्यावा. काही अपवादात्मक परिस्थिती निर्माण झाल्यासच शासनाकडे संदर्भ पाठवावा.

८. ही कामे मंजूर करण्यापूर्वी संबंधित स्थानिक स्वराज्य संस्थांकडून तसेच कामे सार्वजनिक संस्थांना चालविण्यासाठी देण्यापूर्वी त्यांच्याकडून या कामाच्या परिरक्षणासंबंधी हमी घेण्यात यावी.

१४(३) प्रशासकीय मान्यता दिल्यानंतर कामाचा वेग, दर्जा व त्यास अनुषंगिक अन्य बाबी इ.बाबत काही समस्या निर्माण झाल्यास, त्याबाबतची कार्यवाही संबंधित कार्यान्वयीन यंत्रणा व त्यांच्याशी संबंधित प्रशासकीय विभाग यांनी करावयाची आहे.

१४(४) या कार्यक्रमातील कामे कार्यन्वित करणाऱ्या प्रशासकीय विभागांनी नियमीत योजनांप्रमाणेच या कामांची निरिक्षणे करावीत. निरिक्षण अहवालातील त्रुटी दूर करण्यासंदर्भात प्रशासकीय विभागांनी नियमानुसार योग्य ती कार्यवाही करावी.

१४(५) या कार्यक्रमांतर्गत घेण्यात येणाऱ्या कामांचे अहवाल संबंधित कार्यान्वयीन यंत्रणांनी जिल्हाधिकारी यांना दरमहा ५ तारखेपर्यंत सादर करावेत. जिल्हाधिकारी यांनी एकत्रित अहवाल विहित प्रपत्रात विभागीय आयुक्तांना दरमहा १० तारखेपूर्वी सादर करावेत. विभागीय आयुक्तांनी विभागाचा एकत्रित अहवाल शासनास दरमहा १५ तारखेपूर्वी सादर करावा. या कार्यक्रमांतर्गत होण्याऱ्या खर्चाची माहिती जिल्हाधिकारी यांनी दरमहा १० तारखेपर्यंत विभागीय आयुक्तांकडे पाठवावी व विभागीय आयुक्तांनी विभागाच्या खर्चाचा एकत्रित त्रैमासिक अहवाल **परिशिष्ट -६** नुसार शासनास सादर करावा.

१४(६) या कार्यक्रमांतर्गत प्राप्त झालेल्या तरतुदीपैकी पूर्ण तरतूद खर्च होईल किंवा कसे याचा अंदाज कार्यान्वयीन यंत्रणेने द्यावा. निधी खर्च होणार नसेल तर, अखर्चित राहणारा निधी समर्पित करण्याचा प्रस्ताव कार्यान्वयीन यंत्रणेने प्रत्येक आर्थिक वर्षाच्या ५ मार्चपर्यंत जिल्हाधिकारी यांना पाठवावा. जिल्हाधिकारी यांनी निधी अखर्चित राहिल्यास, समर्पित करावयाच्या निधीचा प्रस्ताव प्रत्येक आर्थिक वर्षाच्या १० मार्चपर्यंत शासनास सादर करावा. विहित वेळेत निधी समर्पित न केल्यास संबंधित अधिकारी जबाबदार राहतील.

१४(७) निधी अर्थसंकल्पित करणे व वितरित करणे ही बाब वगळता विधानमंडळाशी संबंधित अन्य बाबी, जसे कामाच्या दर्जाबाबत विधीमंडळात उपस्थित होणारे प्रश्न, निधी अखर्चित राहणे इ., संबंधित प्रशासकीय विभागांनी हाताळावयाच्या आहेत.

१४(८) आमदार स्थानिक विकास कार्यक्रमाशी संबंधित सर्व लेखा विषयक बाबी जसे, दर तिमाहीतील खर्चाचा तसेच वार्षिक खर्चाचा ताळमेळ, संगणक प्रणालीद्वारे उपलब्ध होणाऱ्या निधीचे कार्यान्वयीन यंत्रणांना वाटप, निधीच्या खर्चाची शासनास सादर करण्यात येणारी माहिती व निधी समर्पण, यासंदर्भातील वित्त विभागाच्या व महालेखापाल यांच्याकडील वेळोवेळीच्या निर्देशांनुसार, संबंधित जिल्हाधिकारी यांनी याबाबतची कार्यवाही विहित कालमर्यादेत करावी. **परिशिष्ट -७** मध्ये देण्यात आलेल्या विहित नमुन्यानुसार जिल्हाधिकारी यांनी दर तिमाहीचा खर्च ताळमेळ दर आर्थिक वर्षाच्या जुलै, ऑक्टोबर, जानेवारीच्या १० तारखेपर्यंत व मार्चच्या ३१ तारखेपर्यंत विभागीय आयुक्त यांच्याकडे पाठवावा व विभागीय आयुक्त यांनी दर आर्थिक वर्षाच्या जुलै, ऑक्टोबर,जानेवारीच्या १५ तारखेपर्यंत व मार्चच्या अखेरपर्यंत विभागाचा एकत्रित अहवाल

शासनास पाठवावा.

१४(९) विभागीय आयुक्तांनी जिल्हाधिकारी यांनी मंजूर केलेली कामे अनुज्ञेय असल्याची व वित्तीय मर्यादेत असल्याची खात्री करावी. ही कामे निकषात बसणारी नसतील किंवा वित्तीय मर्यादेचे उल्लंघन करणारी असतील अशा वेळी विभागीय आयुक्तांनी योग्य ती पुढील प्रशासकीय कार्यवाही करावी.

१५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेताक २०११०२१८१९०५०८००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(सुधीर श्रीवास्तव)
प्रधान सचिव.

प्रति:
१ मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव,
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३ मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव,
४ मा.उप मुख्यमंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव,
५ मा.राज्यमंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव,
६ सर्व विभागीय आयुक्त,
७ सर्व जिल्हाधिकारी,
८ सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
९ महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर,
१० महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर,
११ संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
१२ अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१३ सर्व उप आयुक्त (नियोजन), विभागीय आयुक्तांची कार्यालये,
१४ सर्व जिल्हा नियोजन अधिकारी,
१५ सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१६ सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई ( पत्राने),
१७ वित्त विभाग, व्यय-८, मंत्रालय, मुंबई-३२,

१८  वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
१९  ग्रंथपाल,नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
२० बहुजन समाज पार्टी, डी-१, इन्सा हटमेंट, आझाद मैदान, मुंबई-१ (५ प्रती),
२१ भारतीय जनता पाटी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ.बॅरॅक क्र.१, योगक्षेमसमोर,
वसंतराव भागवत चौक, नरीमन पॉईंट, मुंबई-२०  (५ प्रती),
२२ भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभवन, एस.व्ही.पटेल रोड , मुंबई-४(५ प्रती),
२३ महाराष्ट्र कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी), महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई-१३  (५ प्रती),
२४ इंडियन नॅशनल कॉंग्रेस, महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेस (आय) समिती, टिळक भवन,
काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर,मुंबई-२५  (५ प्रती),
२५ नॅशनलिस्ट कॉंग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरिमन पॉईन्ट, मुंबई-२१. (५ प्रती),
२६ शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई-२८  (५ प्रती),
२७ महाराष्ट्र नवनिर्माण सेना, मातोश्री हाईट, पद्माबाई ठक्कर मार्ग, रुपारेल कॉलेज जवळ,
माटुंगा (प), मुंबई-२८  (५ प्रती),
२८  निवड नस्ती, कार्यासन १४८२.

## परिशिष्ट-१

## आमदारांचा स्थानिक विकास कार्यक्रम- सर्वसाधारण अनुज्ञेय कामांची यादी

| अ क्र | प्रशासकीय विभाग | आज्ञेय कामे | आर्थिक मर्यादा (लाखात) | अटी व शर्ती |
|---|---|---|---|---|
| १ | जलसंधारण विभाग | **१. कोल्हापूर पध्दतीचे बंधारे, लघुपाटबंधाऱ्याची कामे , वळण बंधारे, वाराई बंधारे.** | २०.०० | जलसंधारण विभागाने विहीत केलेल्या अटी व शर्ती लागू राहतील. |
| | | **२. रे वॉटर हार्वेस्टींग करणे.** | १५.०० | १) जिल्हाधकारी कार्यालय व आवारातील शासकीय मालकीच्या इमारती, शासकीय विश्रामगृहे, भवा व जिल्हाधिकारी निवासस्थाने वा इतर सर्व शासकीय मालकीच्या इमारतींच्या छतावर पडणाऱ्या पावसाचे संकलन करणे<br>२) या कामाकरिता आमदार स्थानिक विकास कार्यक्रमांतर्गतचा निधी आमदार महोदयांच्या शिफारशीुसार फक्त एकाचवेळी रु.१०.०० लक्षच्या मर्यादेत उपलब्ध करुा देणे आज्ञेय आहे.<br>३) हे काम विहित पध्दतीी करणे आवश्यक असेल. या पाण्याचा उपयोग कशासाठी करण्यात येईल हे प्रथम ाििश्चत करावे. |
| २ | सार्वजनिक बांधकाम विभाग | **१. लहान रस्ते,पूल व साकव बांधणे** | १५.०० | लहान रस्ते,पूल व साकव बांधणे ही कामे सार्वजनिक बांधकाम विभागाच्या प्रमाणकानुसार हाती घेणे आवश्यक राहील. |

| अ क्र | प्रशासकीय विभाग | आज्ञेय कामे | आर्थिक मर्यादा (लाखात) | अटी व शर्ती |
|---|---|---|---|---|
| | | **२. सामाजिक सभागृह बांधणे व कंपाऊंड वॉल** | १५.०० | १) दहा हजारापेक्षा जास्त लोकसंख्या असलेल्या गावांकरिता ७५ आसा क्षमतेची दोा सामाजिक सभागृहे आणि वीस हजारापेक्षा जास्त लोकसंख्या असलेल्या गावांकरिता १५० आसा क्षमतेची दोा समाजिक सभागृहे मंजुर करता येतील.<br>२) अस्तित्वातील सभागृहांसाठी शौचालय, कुंपण भिंती स्वतंत्रपणे घेता येतील.<br>३) बांधकाम आराखडे सार्वजाकि बांधकाम विभागाच्या प्रमाणकाुसार असावेत.<br>४) ज्या ठिकाणी कंपाऊंड वॉल किंवा कुंपण घ्यावयाचे आहे ते पूर्वी कोणत्याही योजोतू झालेले ासावे. काम दुरुस्तीचे ासावे. |

| अ क्र | प्रशासकीय विभाग | आज्ञेय कामे | आर्थिक मर्यादा (लाखात) | अटी व शर्ती |
|---|---|---|---|---|
| ३ | पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग | **१) पाणी पुरवठा योजाा** | १५.०० | १) ज्या गांवासाठी ळपाणी पुरवठा योजाा अगोदरच झाल्या असतील अशा गांवातील वाडयांसाठी जादा पाईप लाई टाकू वाडयांाा पाणी पुरवठा करण्यासंबंधीची कामे.<br>२) पाणी पुरवठा योजाांची कामे पाणीपुरवठा व स्वच्छता विभागाच्या प्रमाणकाुसार करावीत. |
| | | **२) विहिरी खोदणे** | | १) पाणी पुरवठा योजाांची कामे पाणीपुरवठा व स्वच्छता विभागाच्या प्रमाणकाुसार करावीत. |
| | | **३) विंधा विहिरी** | | १) पाणी पुरवठा योजाांची कामे पाणीपुरवठा व स्वच्छता विभागाच्या प्रमाणकाुसार करावीत. |

| अ क्र | प्रशासकीय विभाग | आज्ञेय कामे | आर्थिक मर्यादा (लाखात) | अटी व शर्ती |
|---|---|---|---|---|
| | | **२) स्वच्छता विषयक कामे (महानगरपालिका, नगर पालिका व नगर परिषदा यांच्या हद्दीत)**<br>अ) शौचालयाचे बांधकाम करणे.<br>ब) झोपडपट्टी परीसरात साागृहांचे बांधकाम करणे.<br>क) फिरते शौचालयासाठी लागणारी ट्रॉली खरेदी करणे.<br>ड) स्थानिक स्वराज्य संस्थेसाठी घ-नकचरा वाहून नेण्यासाठी वाहन खरेदी करणे.<br>इ) घाकचरा व्यवस्थापा व सुविधा निर्माण करणे - घंटागाडी व कचरापेटी इत्यादि<br>फ) ग्रामपंचायत हद्दीत गटार बांधणे.<br>ग) शौचालय स्वच्छतेसाठी व्हॅक्यूम इंप्रेयरमेशन | १५.०० | १) शौचालयाची कामे स्थानिक स्वराज्य संस्थाच्या आवारात, एसटी महामंडळाचे थांबे व प्राथमिक शाळांच्या आवारात करण्यात यावीत.<br>२) प्रस्तावित स्वच्छतेची कामे पाणीपुरवठा व स्वच्छता विभागाच्या प्रमाणकाासार करण्यात यावीत. |

| अ क्र | प्रशासकीय विभाग | आज्ञेय कामे | आर्थिक मर्यादा (लाखात) | अटी व शर्ती |
|---|---|---|---|---|
| ४. | शालेय शिक्षण व क्रीडा विभाग | **क्रीडा विषयक कामे-**<br>१. व्यायामशाळांसाठी कायम स्वरूपाचे साहित्य व इतर उपकरणे खरेदी करणे | ५.०० | शासकीय तसेच स्थानिक स्वराज्य संस्थांाी बांधलेल्या व्यायाम शाळांना सहाय देता येईल. |
| | | २. क्रिडांगणांची कामे. | १५.०० | क्रिडांगणांची कामे क्रिडा विभागाच्या क्रिडांगण विकास योजनेच्या निकषानुसार शासकीय व शासन अनुदानीत प्राथमिक / माध्यमिक शाळा, कनिष्ठ महाविद्यालये, आश्रमशाळा यांच्य करीता करता येतील. |
| | | ३.उद्याचा विकास व बालकांसाठी क्रीडा साहित्य उपलब्ध करूा देणे. | ५.०० | |
| | | ४.महापालिका क्षेत्रातील मोकळया जागेचे मैदाात/ उद्याात रुपांतर करणे व त्यास कुंपण घालणे . | १५.०० | ज्या ठिकाणी कंपाऊंड वॉल किंवा कुंपण घ्यावयाचे आहे ते पूर्वी कोणत्याही योजोतून झालेले नसावे. काम दुरुस्तीचे नसावे. |

| अ क्र | प्रशासकीय विभाग | आज्ञेय कामे | आर्थिक मर्यादा (लाखात) | अटी व शर्ती |
|---|---|---|---|---|
| | | **शिक्षण विषयक कामे-**<br>१.आदिवासी क्षेत्रात शासकीय आश्रमशाळांची बांधकामे व कंपाउंड वॉल | १५.०० | **१) आदानित प्राथमिक,माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळा तसेच प्राथमिक व माध्यमिक शाळा ज्या विाा आदान तत्वावर आहेत तसेच ज्या कायम विनाआदान तत्वावर परवानगी दिलेल्या शाळा आहेत व ज्यांच्या परवानगी ओदशातील "कायम" हा शब्द वगळण्यात आलेला आहे अशा शाळाना आदिवासी विकास विभागाच्या ाकिषानुसार या सुविधा देता येंतील.**<br>२) शाळा बांधकामाचे निकष संबंधित विभागाने विहित केल्या-नुसार राहतील.<br>३) ज्या ठिकाणी कंपाऊंड वॉल किंवा कुंपण घ्यावयाचे आहे ते पूर्वी कोणत्याही योजोतूा झालेले नसावे. काम दुरुस्तीचे नसावे. |
| | | २.प्राथमिक शाळांच्या नावीन खोल्या बांधणे व कंपाउंड वॉल | १५.०० | आदानित प्राथमिक,माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळा तसेच प्राथमिक व माध्यमिक शाळा ज्या विना आदान तत्वावर आहेत तसेच ज्या कायम विाआदाना तत्वावर परवानागी दिलेल्या शाळा आहेत व ज्यांच्या परवाागी ओदशातील "कायम" हा शब्द वगळण्यात आलेला आहे अशा शाळांना शालेय शिक्षण विभागाच्या निकषाासार या सुविधा देता येंतील. |
| | | ३.प्राथमिक व माध्यमिक शाळांसाठी संगणक खोलीचे बांधकाम | ५.०० | शासकीय / जिल्हा परिषदा / महानगरपालिका / नगरपालिकांच्या शाळांपुरता मर्यादित राहील. |

| अ क्र | प्रशासकीय विभाग | आज्ञेय कामे | आर्थिक मर्यादा (लाखात) | अटी व शर्ती |
|---|---|---|---|---|
| | | ४.प्राथमिक शाळा खोलीची विशेष दुरुस्ती | ५.०० | शाळा दुरुस्तीचे निकष संबंधीत विभागाने विहित केल्यानुसार राहतील. |
| | | ५.प्राथमिक शाळांमध्ये विद्यार्थ्यांना खेळण्याकरिता साहीत्य | ५.०० | आदानित प्राथमिक, प्राथमिक शाळा ज्या विना आदान तत्वावर आहेत तसेच ज्या कायम विनाआदान तत्वावर परवानगी दिलेल्या शाळा आहेत व ज्यांच्या परवागी ओदशातील "कायम" हा शब्द वगळण्यात आलेला आहे अशा शाळांना या सुविधा देता येंतील. |
| | | ६.प्राथमिक,माध्यमिक तसेच उच्च माध्यमिक शाळांना शैक्षणिक, अध्यापा, क्रीडा, प्रयोगशाळा साहित्य व डेस्क बेंचेस तसेच वॉटर प्युरिफायर पुरविणे. | ५.०० | आदानित प्राथमिक,माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळा तसेच प्राथमिक व माध्यमिक शाळा ज्या विाा आदाा तत्वावर आहेत तसेच ज्या कायम विनाआदान तत्वावर परवाागी दिलेल्या शाळा आहेत व ज्यांच्या परवानगी ओदशातील "कायम" हा शब्द वगळण्यात आलेला आहे अशा शाळांना या सुविधा देता येंतील |
| | | ७.दि महाराष्ट्र राज्य भारत स्काऊट आणि गाईड या संस्थेच्या विविध उपक्रमाना निधी देणे. | ५.०० | |
| | | ८.माध्यमिक,उच्च माध्यमिक शाळा व महाविद्यालयांमध्ये संगणक व आुषंगिक साहित्य उपलब्ध करणे | ५.०० | १) सा.प्र.वि. च्या प्रचलित दर करारानुसार खरेदी करण्यात यावी.<br>२)एका शाळेला जास्तीत जास्त रु.५.०० लाखाच्या मर्यादेत खरेदी करण्यास अनुमती |

| अ क्र | प्रशासकीय विभाग | आज्ञेय कामे | आर्थिक मर्यादा (लाखात) | अटी व शर्ती |
|---|---|---|---|---|
| | | **९.प्राथमिक,माध्यमिक,उच्च माध्यमिक व आश्रमशाळा यांना एल.सी.डी. प्रोजेक्टर देणे.** | १.०० | आदानित प्राथमिक,माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळा तसेच प्राथमिक व माध्यमिक शाळा ज्या विना आदान तत्वावर आहेत तसेच ज्या कायम विनाआदान तत्वावर परवानगी दिलेल्या शाळा आहेत व ज्यांच्या परवानगी आदेशातील "कायम" हा शब्द वगळण्यात आलेला आहे अशा शाळांना या सुविधा देता येंतील |
| | | **१०. अंध,अपंग,मतिमंद व गतीमंद मुलांसाठी चालवण्यात येणाऱ्या शाळांसाठी वर्गखोल्यांचे बांधकाम, स्वच्छता गृहांचे बांधकाम,सुरक्षित क्रिडांगणे,श्रवणयंत्रे व त्यास आवश्यक इतर बाबी तसेच ब्रेल लिपीच्या सॉफ्टवेअरची कामे** | १५.०० | धर्मदाय आयुक्तांकडे नोंदणी करण्यात आलेल्या व शासानाची मायता असणाऱ्या अंध,अपंग,मतिमंद व गतीमंद मुलांसाठी चालवण्यात येणाऱ्या शाळांसाठी िधी देता येईल. |
| ५ | ग्रामविकास/नगर विकास विभाग | **१. स्मशाभूमीची कामे** **महाागरपालिका, नगरपालिका, - नगरपरिषद व ग्रामपंचायती (नगरपरिषद होण्याचे िकष पूर्ण करण्यास पात्र असणाऱ्या)** | १५.०० | सदरची कामे ग्राम विकास /नगर विकास विभागाच्या प्रमाणकानुसार करण्यात यावीत. |
| | | २. ग्राम सचिवालय बांधणे | १५.०० | सदरची कामे ग्राम विकास /नगर विकास विभागाच्या प्रमाणकानुसार करण्यात यावीत |

| अ क्र | प्रशासकीय विभाग | आज्ञेय कामे | आर्थिक मर्यादा (लाखात) | अटी व शर्ती |
|---|---|---|---|---|
| ६ | उच्च व तंत्रशिक्षण विभाग | १. सार्वजाीक वाचनालय बांधकाम | १५.०० | १) सदरची वाचनालये शासकीय, स्थानिक स्वराज्य संस्थांच्या मालकीच्या जागांवरच असावीत.<br>२) बांधकामे उच्च व तंत्रशिक्षण विभागच्या प्रमाणकानुसार करण्यात यावीत |
| | | २.वाचनालयासाठी पुस्तके, संगणक, पुस्तके ठेवण्यासाठी रॅक्स व कपाटे पुरविणे | --- | **१) महाराष्ट्र सार्वजनिक ग्रंथालये नियम,१९७० अन्वये ग्रंथालय संचालाालयाकडून त्या त्या वर्गाप्रमाणे देण्यात येणाऱ्या आुदानाच्या मर्यादेपर्यंत पुस्तके, संगणक, पुस्तके ठेवण्यासाठी रॅक्स व कपाटे अनुज्ञेय** |
| ७ | महिला व बाल विकास विभाग | बालवाडी, अंगणवाडी करिता इमारत बांधणे | विभागाच्या निकषाप्रमाणे | महिला व बाल विकास विभागाच्या निकषानुसार व आराखडयानुसार बांधकाम करणे आवश्यक आहे. |
| ८ | सार्वजनिक आरोग्य विभाग | १. प्राथमिक आरोग्य केंद्र, उप केंद्र बांधकाम व कंपाऊंड वॉल बांधणे.<br>२. स्थाािक संस्थांसाठी फॉगींग मशिन | १५.०० | ज्या ठिकाणी कंपाऊंड वॉल किंवा कुंपण घ्यावयाचे आहे ते पूर्वी कोणत्याही योजनेतून झालेले नसावे. काम दुरुस्तीचे नसावे.<br>१) सार्वजनिक आरोग्य विभागाच्या निकषाुसार<br>२) स्थाािक स्वराज्य संस्थेने देखभाल दुरुस्तीची हाती घेणे आवश्यक. |
| | | २. प्राथमिक आरोग्य केंद्र, ग्रामीण रुग्णालय येथे पोस्टमार्टम रुमचे बांधकाम, प्रतिक्ष कक्ष व कंपाऊंड वॉल | १५.०० | |

| अ क्र | प्रशासकीय विभाग | आज्ञेय कामे | आर्थिक मर्यादा (लाखात) | अटी व शर्ती |
|---|---|---|---|---|
| | | ३. स्थानिक स्वराज्य संस्थांच्या रुग्णालयांना तसेच प्राथमिक आरोग्य केंद्रासाठी आवश्यकता असल्यास रुग्णवाहिकेसाठी व शववाहिकेसाठी निधी उपलब्ध करुा देणे. | १०.०० | या रुग्णवाहिकेकरिता व शववाहिकेकरिता कर्मचारी वर्ग , इंधन व देखभाल दुरुस्तीचा खर्च संबंधित स्थानिक स्वराज्य संस्थेने करणे आवश्यक आहे. |
| ९ | उर्जा विभाग | **१. सार्वजाकि रस्त्यावर दिवाबत्तीची सोय करणे. महानगरपालिका,नगरपालिका, -नगरपरिषद व ग्रामपंचायती (नगरपरिषद होण्याचे निकष पूर्ण करणाऱ्यास पात्र असणाऱ्या) क्षेत्रात हायमास्ट दिव्यांची सोय करणे.** | ५.०० | हे काम संबंधित ग्रामपंचायत, नगरपालिका, किंवा महा-नगरपालिका इ. स्थानिक स्वराज्य संस्थानी करणे आवश्यक असेल. |
| | | २. सार्वजाकि दिवाबत्तीची सोय करणे वा विद्युत खांब व तार जोडणी सहित विद्युत दिवे बसविणेसाठी कंपीस आदाा मंजुर करणे. | १५.०० | महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी त्यांच्या निधीतून सदर कामे करण्यास असमर्थता व्यक्त केली असावी. |
| | | ३. अपारंपारिक उर्जा साधनांची आस्थापना करणे. | १५.०० | १) अशी कामे ग्रामपंचायत, नगरपालिका, महानगरपालिका तसेच बृहमुंबई क्षेत्रात इमारती, दवाखाने, शाळा, बगीचे, पदपथ व शासकीय इमारती अशा सार्वजाकि ठिकाणी करावीत.<br>२) ही कामे महाराष्ट्र उर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा) यांचे कडूा व त्यांच्या सल्ल्याने विविध पध्दतीचा अवलंब करुन करावीत. |

| अ क्र | प्रशासकीय विभाग | आज्ञेय कामे | आर्थिक मर्यादा (लाखात) | अटी व शर्ती |
|---|---|---|---|---|
| १० | गृह(परिवहना) | १. महाराष्ट्र राज्य परिवहा महामंडळाच्या ग्रामीण व नागरी भागातील एस.टी.थांब्यावर ाािवारे (Shades) बांधणे. | २.५० | **सदरचे एस.टी.थांबे स्थाािक गरजेाुसार योग्य असलेल्या साहित्याताू व जागेच उपलब्धतेाुसार बांधण्यात यावेत.** |
| | | २. एसटी महामंडळाचे जागेवर प्रवाश्यांसाठी प्रतिक्षालय व वाहतूक ाियंत्रण कक्ष बांधणे | १५.०० | |
| | | ३. राज्यातील समुद्रकिाारे, नद्या, खाडया येथे जलवाहतुकीच्या उपयोगासाठी उतारु धक्के बांधणे. | २.०० | अशा ठिकाणी सध्या उतारु धक्का अस्तित्वात नसावा. |
| | | **४. स्थाािक स्वराज्य संस्थांसाठी आगप्रतिबंधक उपकरणे खरेदी करणे.** | २.०० | |

| अ क्र | प्रशासकीय विभाग | आज्ञेय कामे | आर्थिक मर्यादा (लाखात) | अटी व शर्ती |
|---|---|---|---|---|
| ११ | गृहनिर्माण विभाग | **महानगरपालिका क्षेत्रातील विशेष कामेः**<br>१) महानगरपालिका क्षेत्रातील उपकर आकारण्यात आलेल्या चाळीमधील (सेस्ड ब्लिडींग) गल्ल्या, गटारे सार्वजाकि स्वच्छतागृहे बांधणे व त्याची दुरुस्ती, दुरुस्त न होणाऱ्या शौचालयाची पुर्बांधणी व दुरुस्ती, सार्वजाकि हाणी गृहे बांधणे, सार्वजाकि जिो, पॅसेज व व्हरांडे यांची दुरुस्ती अशी कामे, त्याचप्रमाणे पिण्याच्या पाण्याच्या पध्दतीच्या दुरुस्तीची कामे. | १५.०० | या कामात चाळीच्या इमारतींची दुरुस्ती, भिंतींना प्लॅस्टर लावणे, रंग लावणे, विद्युतीकरण करणे अशी कामे घेता येणार नाहीत. |
| | | २) महानगरपालिका क्षेत्रातील खाजगी/ शासकीय/ महानगरपालिका यांच्या मालकीच्या जागांवर घोषित गलिच्छ वस्त्यांत सार्वजाकि उपयोगाच्या बालवाडया, व्यायामशाळा बांधणे. | १५.०० | |
| | | ३) महानगरपालिकेच्या मालकीच्या इमारतीमधील अशी विशिष्ट दुरूस्तीची कामे जसे की, गल्ल्या, गटारे, सार्वजनिक स्वच्छतागृहे व संडास यांची दुरूस्ती व पिण्याच्या पाण्याच्या पध्दतीच्या दुरूस्तीची कामे, | १५.०० | अशा इमारतींची दुरूस्ती, भिंतींना प्लॅस्टर लावणे, रंग लावणे, विद्युतीकरण करणे अशी कामे या कार्यक्रमाखाली घेता येणार नाहीत. |

| अ क्र | प्रशासकीय विभाग | अाज्ञेय कामे | आर्थिक मर्यादा (लाखात) | अटी व शर्ती |
|---|---|---|---|---|
| | | ४) झोपडपट्टयांमध्ये (घोषित गलिच्छ वस्त्या) सार्वजाकि सुविधा निर्माण करण्याची शासाची जबाबदारी आहे अशा ठिकाणी सार्वजनिक उपयोगाकरिता साागृहे, संडास, अस्तित्वात नसलेल्या संडासाची दुरूस्ती, पायवाटा, सार्वजनिक स्वरूपाचा पाणीपुरवठा व दिवाबत्ती अशी सामाय स्वरुपाची कामे, | १५.०० | |
| | | ५) बृहमुंबई महानगरपालिका क्षेत्रातील शासकीय मालकीच्या बी.डी.डी.चाळी व बी.आय.टी. चाळी यामधील वर क्र. ३ मध्ये उल्लेखिलेली दुरूस्तीची कामे, | १५.०० | एका चाळीच्या अशा कामावरील खर्च मात्र रू. १५.०० लाखाच्या मर्यादेत असला पाहिजे. |
| | | ६) महानगरपालिकेच्या अथवा शासनाच्या मालकीच्या रस्त्यांवर पदपथ (फुटपाथ) बांधणे किंवा त्यांची विशेष दुरुस्ती ही कामे, | १५.०० | प्रत्येक कामाचा खर्च रु. १५.०० लाख हया विहीत मर्यादेत असला पाहिजे. नैमित्तिक वा किरकोळ दुरुस्तीची कामे मात्र घेता येणार नाही. |
| | | ७)बृहमुंबईमध्ये उपकर आकारण्यात येणाऱ्या "अ" वर्गीय चाळींची दुरुस्ती करणे, | १५.०० | म्हाडाच्या (घर दुरुस्ती मंडळ) निकषाप्रमाणे अनुज्ञेय असलेली कामे घेण्यात यावीत. |

| अ क्र | प्रशासकीय विभाग | आज्ञेय कामे | आर्थिक मर्यादा (लाखात) | अटी व शर्ती |
|---|---|---|---|---|
| | | ८) डोंगर उतारावर जेथे घोषित गलिच्छ वस्त्या असतील तेथे डोंगरावरील दरडी कोसळू नयेत म्हणनू संरक्षक भिंत बांधणे तसेच समुद्राच्या वा नदीकाठी जेथे घोषित गलिच्छ वस्त्या असतील तेथे संरक्षक भिंत बांधणे.<br>**महानगरपालिका क्षेत्रातील इतर कामे.**<br>**सदरची कामे नगरपालिका, - नगरपरिषद, नगर पंचायती व मोठया ग्रामपंचायती (नगरपालिका/ - नगरपरिषद होण्याचे निकष पूर्ण करणाऱ्यास पात्र असणाऱ्या) क्षेत्रात देखील करता येतील**<br>(१) मैदान/ बागः-<br>सुशोभित कुंपण, मैदााच्या बाजूला<br>झाडांची लागवड, असाांची सोय, कचरापेटी, प्रकाश योजाा, पक्क्यास्वरूपाची खेळणी, पाणपोई,<br>(२) समुद्रकिााराः- स्वच्छतागृह, प्रकाश योजाा, कचरापेटया, पाणपोई. सुरक्षिततेच्या दृष्टीा उपाययोजाा. | १५.०० | |

| अ क्र | प्रशासकीय विभाग | आज्ञेय कामे | आर्थिक मर्यादा (लाखात) | अटी व शर्ती |
|---|---|---|---|---|
| | | (३) तलाव- सुशोभित कुंपण, तलाव स्वच्छ करणे (गाळ काढणे वगळून). प्रकाश योजना, लादिच्या मार्गिका,<br>झाडांची लागवड, कचरा पेटी, आसने.<br>(४) नदी- घाट बांधणे, झाडांची लागवड, प्रकाश योजना, सुरक्षा व्यवस्था, कचरापेटी स्वच्छतागृहे, संरक्षण भिंत, पायऱ्या बांधणे<br>बगीचा, प्रकाश योजना, ऐतिहासिक माहितीचे फलक.<br>(६) वाहतूक बेट- सुशोभित कुंपण, हिरवळ, प्रकाश योजना, रॉक गार्डा इत्यादी.<br>(५) किल्ला- झाडांची लागवड, बगीचा, प्रकाश योजना, ऐतिहासिक माहितीचे फलक.<br>(६) वाहतूक बेट -सुशोभित कुंपण, हिरवळ, प्रकाश योजना, रॉक गार्डा इत्यादि.<br>(७) फुटपाथवर पेव्हर ब्लॉक बसविणे. | प्रत्येक कामा करिता मर्यादा ५.०० | |

| अ क्र | प्रशासकीय विभाग | आज्ञेय कामे | आर्थिक मर्यादा (लाखात) | अटी व शर्ती |
|---|---|---|---|---|
| १२ | सामाय प्रशासा विभाग | हुतात्मा स्मारकांची दुरुस्ती करणे. | ५.०० लाख | भारतीय स्वातंत्र लढा, हैद्राबाद मुक्ती संग्राम तसेच अय स्वातंत्र्य लढयातील व्यक्तींच्या स्मरणार्थ राज्यात २०६ ठिकाणी जी हुतात्मा स्मारके उभारली आहेत, त्यांच्या दुरुस्तीचा खर्च आमदार महोदयांच्या शिफारशी- ुसार फक्त एकदाच करणे विहित कार्यपध्दतीुसार आज्ञेय असेल. |
| | | आमदार स्थाािक विकास कार्यक्रमांतर्गत विधाामंडळ सदस्यांना लॅपटॉप / डेस्कटॉप संगणक व लेझर प्रिंटर पुरविणे | | **नियोजन विभाग, शासन निर्णय क्र.स्थाविका-२०१० / प्र.क्र.३९/का.१४८२,दि.९ऑगस्ट,२०१०अवये कार्यवाही करण्यात यावी.** |

## परिशिष्ट-२

## आमदारांचा स्थानिक विकास कार्यक्रम- सर्वसाधारण अनुज्ञेय नसलेल्या कामांची यादी

| | |
|---|---|
| १ | जिल्हा नियोजन समितीच्या अखत्यारित नसलेली कामे, उदा. कोणत्याही प्रकारच्या कार्यालयीन इमारती, ग्रामपंचायत भवन, निवासस्थाने, विश्रामगृहे, टी.व्ही.सेंटर, बचत भवन इत्यादी इमारतींच्या खर्चासाठी पूरक निधी (ही सर्व राज्यस्तरीय कामे आहेत.), |
| २ | खाजगी संस्थांची / सहकारी संस्थांची / वैयक्तिक लाभधारकांची कामे, |
| ३ | कोणत्याही प्रकारची (प्राथमिक शाळाखोलीची व विशिष्ट वस्त्यांतील समाजमंदिरांची विशेष दुरुस्ती वगळून) दुरुस्तीची कामे, |
| ४ | एखाद्या मोठया कामाला कमी पडणारी पूरक म्हणून तरतूद, |
| ५ | एखाद्या मोठया कामासाठी निरनिराळया स्त्रोतातून निधी मिळवण्याच्या प्रयत्नात एक स्त्रोत म्हणून हया कार्यक्रमाखाली तरतूद सुचविणे, |
| ६ | मोठया कामांचे भाग करुन ती लहान कामे म्हणून घेणे, |
| ७ | खाजगी संस्थांना / सहकारी संस्थांना अनुदान/कर्ज/ सहायता निधीला वर्गणी, |
| ८ | घरकुले, |
| ९ | स्मारके, स्मृती बांधकामे (हुतात्मा स्मारके वगळून) व स्वागत कमानी उभारणे, |
| १० | होडया, वीजखांब इत्यादी प्रकरणी स्टॉक म्हणून खरेदी, |
| ११ | प्राथमिक शाळा खोली सोडून इतर शाळा/ विद्यालये / महाविद्यालये यांच्या इमारती, त्यांना कुंपण घालणे इत्यादी, |
| १२ | रस्त्यांचे पुनर्डांबरीकरण करणे, |
| १३ | हॉटमिक्स, हॉटलंड खरेदी, |
| १४ | भूसंपादन / भूसंपादनाचा मोबदला म्हणून देण्यात येणारी रक्कम, |
| १५ | महसुली व आवर्ती स्वरुपाचा खर्च, |
| १६ | धार्मिक स्थळे (परिसर विकास वगळून), |
| १७ | वैयक्तिक किंवा कौटुंबिक स्वरुपाची कोणतीही मालमत्ता निर्माण होणारी कामे, |
| १८ | एखादया योजनेत लोकवर्गणीचा हिस्सा असल्यास अश्या हिश्याच्या ऐवजी आमदार निधी उपलब्ध करुन देता येणार नाही, |
| १९ | ज्या प्रयोजनाकरिता राज्य शासनाच्या राज्यस्तरीय किंवा जिल्हास्तरीय योजनांकरिता किंवा केंद्र सरकारकडून निधी उपलब्ध होत असेल तर अशा प्रयोजनासाठी आमदार निधी उपलब्ध करून देता येणार नाही. अपवाद-नैसर्गिक किंवा मानवनिर्मित आपत्तीमुळे (दंगली) उद्‌भवलेल्या संकटकालीन परिस्थितीत लोकहितार्थ सार्वजनिक स्वरुपाची कामे, |
| २० | आवर्ती स्वरुपाच्या खर्चाकरिता, वेतनाकरिता, इंधनाकरिता व देखभाल दुरुस्तीकरिता या निधीचा वापर करता येणार नाही. या अनुषंगिक आर्थिक भार संबंधित स्थानिक स्वराज्य संस्था/इतर शासकीय /निमशासकीय संस्था यांनी उचलावयाचा आहे व तशी लेखी हमी देणे आवश्यक राहील. |

# परिशिष्ट-३

## आमदार स्थानिक विकास कार्यक्रम- अनुज्ञेय निधीच्या ५% तून घ्यावयाच्या कामांची यादी

| | |
|---|---|
| १ | थंड हवेच्या ठिकाणी अथवा पर्यटन स्थळी पर्यटकांच्या सुरक्षितेसाठी सार्वजनिक विभागाच्या मापदंडानुसार सिमेंटचे संरक्षक कट्टे किंवा पाईप रेलींग बांधणे. |
| २ | शासकीय व स्थानिक स्वराज्य संस्थांच्या कार्यालयामध्ये माहिती तंत्रज्ञान वापरासाठी खर्च करणे. |
| ३ | **शासनाच्या वतीने आयोजित करण्यात येणाऱ्या सर्व स्तरावरील तसेच, विविध मान्यता प्राप्त एकविध खेळांच्या अधिकृत संघटनाद्वारा आयोजित तालुका,जिल्हा,राज्य,राष्ट्रीय तसेच आंतरराष्ट्रीय स्तरावरील स्पर्धा, विधानसभा तसेच विशिष्ट मतदारसंघ असलेले विधान परिषद सदस्य यांना त्यांच्या मतदार संघाबाहेर रु.२.०० लाखाच्या मर्यादेत निधी प्रस्तावित करणे.** |
| ४ | **पूर परिस्थितीच्या वेळी आवश्यक असणारे साधने जसे लाईफ सेव्हींग जाकेट इ.** |
| ५ | **शासनाच्या वतीने आयोजित करण्यात येणारे पर्यटन महोत्सव,** |
| ६ | **ग्रामपंचायतीच्या आवारात मोटारपंप बसविणे,** |
| ७ | **शासकीय कार्यालयात सुचना फलक बसविणे,** |
| ८ | राज्यामध्ये नैसर्गिक आपत्तीपोटी पुनर्वसन कार्यासाठी निधी उपलब्ध करणे.या कामाकरिता विधानसभा मतदार संघाबाहेर तसेच ज्या विधान परिषद सदस्यांना विहित कार्यक्षेत्रातच निधी देणे अनुज्ञेय आहे असे विधान परिषद सदस्य आपल्या कार्यक्षेत्राबाहेर निधी देऊ शकतील. |
| ९ | प्रकल्पबाधित गावठाणातील रस्ते, समाजमंदिरे, शाळा खोल्या इत्यादिंच्या विशेष दुरुस्तीची कामे. |
| १० | राज्यात नदया, तळे येथे सार्वजनिक उपयोगासाठी कपडे धुण्यासाठी घाट बांधणे. |
| ११ | **ग्रामपंचायतीसाठी व्यासपीठ/रंगमंच (स्टेज) बांधणे,** |
| १२ | डोंगरी भागातील रस्त्यांच्या वळणावर, नदीच्या काठावर व उघडया विहिरींवर संरक्षक भिंती / कठडे बांधणे. |
| १३ | जनावरांना पिण्याचे पाणी पुरविण्यासाठी हाळ बांधणे, |
| १४ | ग्रामपंचायत व नगरपालिका क्षेत्रात आठवडी बाजाराकरिता ओटयांचे बांधकाम करणे |
| १५ | ग्रामपंचायत व नगरपालिका क्षेत्रात अग्निशमनाचे साहित्य खरेदी करणे |
| ६ | शासनाने जाहिर केलेल्या पर्यटन स्थळी ऐतिहासिक माहिती दर्शक फलक लावणे |

**परिशिष्ट ४**

आमदार स्थानिक विकास कार्यक्रम

कामाच्या परिरक्षण व देखभालीचे हमीपत्र

शासन निर्णय, नियोजन विभाग क्र.स्थाविका-२००७/प्र.क्र.१७०/का.१४४५(१४८२),

दि.१८ फेब्रुवारी, २०११ मधील परिच्छेद क्र.७(३) अन्वये हमीपत्र प्राप्त करुन घेण्याचा नमूना

---------------------------------------------------------------------------------------

हे काम ग्रामपंचायत / नगरपालिका / नगर परिषद /नगर पंचायती / जिल्हा परिषद /महाराष्ट्र पाणी पुरवठा व जलनिःसारण मंडळ / म्हाडा या संस्थेमार्फत /अभिकरणामार्फत घेण्यात येत असून, सदरचे काम पूर्ण झाल्यावर त्याची देखभाल / परिरक्षण, ही / हे ग्रामपंचायत / नगर पालिका /नगर परिषद /नगर पंचायती / जिल्हा परिषद /महाराष्ट्र पाणी पुरवठा व जलनिःसारण मंडळ / म्हाडा इत्यादि अभिकरण करण्यास तयार आहे.

( )

संस्थेचे / अभिकरणाचे नांव व शिक्का

ठिकाण :

दिनांक :

**परिशिष्ट ५**

**आमदार स्थानिक विकास कार्यक्रमांतर्गत घेतलेल्या कामांच्या जिल्हास्तरावरील पथकाकडून केलेल्या तपासणीसंबंधीचा अहवाल**

**<u>शासन निर्णय, नियोजन विभाग क्र.स्थाविका-२००७/प्र.क्र.१७०/का.१४४५(१४८२), दि. १८ फेब्रुवारी, २०११ मधील परिच्छेद क्र.१०(१) अन्वये पाठवावयाच्या अहवालाचा नमूना</u>**

| | | |
|---|---|---|
| १ | जिल्हयाचे नांव | |
| २ | अ. अहवालाचे वर्ष<br>ब. तपासणीचा दिनांक | |
| ३ | पथकातील अधिकाऱ्यांची नांवे व पदनामे | १)<br>२)<br>३)<br>४) |
| ४ | पथकाने भेट दिलेल्या कामांची नांवे व ज्या गांवात ही कामे घेतली असतील त्या गांवाचे नांव<br>अ) कामे केलेल्या यंत्रणेचे नांव<br>ब) काम केव्हा मंजूर करण्यात आले.<br>क) कामाला प्रत्यक्ष केव्हा सुरुवात केली.<br>ड) काम केव्हा पूर्ण झाले. | |
| ५ | कामाचे स्वरुप व मंजूर केलेला अंदाजित खर्च. | |
| ६ | काम नियोजित ठिकाणी घेतले आहे किंवा कसे व ते पूर्ण झाले आहे किंवा कसे ? | |
| ७ | कामावर एकूण झालेला खर्च रुपये. | |
| ८ | काम पूर्ण झाले नसल्यास, पूर्ण न होण्याची कारणे व काम केव्हा पूर्ण होणे अपेक्षित आहे. | |
| ९ | कामाचा सर्वसाधारण दर्जा कसा आहे. | |
| १० | काम मंजूर करतांना जो उपयोग दाखविला होता त्याप्रमाणे त्याचा उपयोग केला जातो किंवा नाही व नसल्यास त्याची कारणे. | |
| ११ | कामामध्ये काही त्रृटी निदर्शनास आल्या आहेत का? असल्यास कोणत्या? | |
| १२ | त्रृटी निदर्शनास आल्या असल्यास त्या दूर करण्यासाठी कोणती कार्यवाही केली. | |
| १३ | काम पूर्ण झाले असल्यास काम पूर्ण झाल्याबद्दलचा दाखला दिला आहे का व ते काम संबंधित यत्रणेकडून हस्तांतरित करण्यात आले किंवा कसे. | |
| १४ | शेरा. | |

**(तपासणी पथकाच्या प्रमुख अधिका-याचे नाव व स्वाक्षरी)**

# परिशिष्ट-६

## आमदार स्थानिक विकास कार्यक्रम - सन -२०

## शासन निर्णय, नियोजन विभाग क्र.स्थाविका-२००७/प्र.क्र.१७०/का.१४४५(१४८२),

## दि. १८ फेब्रुवारी, २०११ मधील परिच्छेद क्र.१४(५) अन्वये पाठवावयाच्या अहवालाचा नमूना

विभाग - माहे - --- अखेरचा त्रैमासिक प्रगती अहवाल

**(रुपये लाखात)**

| अ. क्र. | जिल्हा | विधानसभा मतदारसंघाकरिता अनुज्ञेय निधी | विधान परिषद सदस्यांकरीता अनुज्ञेय निधि | शासना कडून वितरीत एकूण निधी | अपूर्ण कामांचा तपशील | | नविन कामांचा तपशील | | | खर्चाचा तपशील | | | | कामाची भौतिक स्थिती | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | कामांची संख्या | अपूर्ण कामे पूर्ण करण्यासाठी लागणारा निधी | कामांची संख्या | उपलब्ध अनुदान | चालू वर्षात प्रशासकीय मंजूरी दिलेल्या कामांची अंदाजित किंमत | अपूर्ण व जुन्या कामावरील खर्च (रकाना ६ व ७ शी संबंधित) | नविन कामावरील खर्च (रकाना ८ व १० शी संबंधित) | एकूण खर्च (रकाना ११ + रकाना १२) | प्राप्त अनुदानाशी खर्चाची टक्केवारी (रकाना ५ व १३ शी संबंधित) | पूर्ण कामे (रकाना ६ व ८ शी संबंधित) | सुरु कामे (रकाना ६ व ८ शी संबंधित) | सुरु न झालेली कामे (रकाना ६ व ८ शी संबंधित) | रद्द कामे (रकाना ६ व ८ शी संबंधित) |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १३ | १४ | १५ | १६ | १७ | १८ |
| | | | | | | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | | | | | | 0 |
| | | | | | | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | | | | | | |

(विभागीय आयुक्त यांची स्वाक्षरी)

**परिशिष्ट - ७**

**आमदार स्थानिक विकास कार्यक्रम खर्च ताळमेळ - वित्तीय वर्ष : २०**

**शासन निर्णय, नियोजन विभाग क्र.स्थाविका-२००७/प्र.क्र.१७०/का.१४४५(१४८२),**

**दि.१८ फेब्रुवारी, २०११ मधील परिच्छेद क्र.१४(८) अन्वये पाठवावयाच्या अहवालाचा नमूना**

**जिल्हा :** **( रुपये लाखात )**

| अ. क्र. | लेखाशीर्ष/ उपशीर्ष क्र. संकेताक | शासनाकडून प्राप्त निधी | महालेखापालाकडे नोंदविलेला खर्च | जिल्हयाकडे नोंदविलेला प्रत्यक्ष खर्च | महालेखापाल कार्यलयापेक्षा कमी (-) /अधिक (+) नोंदविलेला खर्च | तफावतीचे समर्थन व तफावत दूर करण्या- करिता केलेले प्रयत्न (नोट ऑफ एरर सादर केली असल्यास त्याचा तपशील) | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| | | | | | | | |
| | | | | | | | |

**(जिल्हाधिकारी यांची स्वाक्षरी)**